**पर्यटन सुलभ मार्गदर्शक (गाईड) प्रशिक्षण कार्यक्रम राज्यातील विविध पर्यटनस्थळी राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी २०२१/०६/प्र.क्र.३७७/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०२१.

**संदर्भ :-**
१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
२) पर्यटन संचालनालयाचे पत्र क्र.पर्यटन संचालनालय/ प्रशिक्षण / २०२१/ २७०८, दि.२४.०८.२०२१

**प्रस्तावना :-**

राज्यात पर्यटनाला खूप वाव असून वैविध्यपूर्ण पर्यटनस्थळाची इत्यंभूत व योग्य अशी माहिती प्राप्त करुन तेथील भेट आनंददायी व अविस्मरणीय होण्यासाठी पर्यटकांना चांगल्या मार्गदर्शकांची आवश्यकता भासते. त्याचबरोबर मार्गदर्शकांच्या माध्यमातून त्या ठिकाणचे स्थानिक नियम, सुरक्षिततेच्या उपाययोजना यांची अंमलबजावणी योग्यरितीने शक्य होते. त्यादृष्टीने राज्यातील निवडक पर्यटनस्थळी पर्यटन सुलभ मार्गदर्शक (गाईड) प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास मान्यता देण्याची व सदर प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता आवश्यक असलेला निधी उपलब्ध करुन देण्याची संचालक, पर्यटन संचालनालय यांनी संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २४.०८.२०२१ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. यानुसार निवडक पर्यटनस्थळी पर्यटन सुलभ मागदर्शक (गाईड) प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास मान्यता देण्याची व त्याकरीता आवश्यक निधी संचालक, पर्यटन संचालनालय यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील निवडक पर्यटनस्थळी पर्यटन सुलभ मार्गदर्शक (गाईड) प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास व सदर प्रशिक्षण कार्यक्रमासाठी आवश्यक असलेल्या खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे एकूण रु.५६.०० लक्ष (करांसहित) इतका निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन संचालक, पर्यटन संचालनालय यांना वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पर्यटनस्थळ / विभाग | प्रशिक्षण खर्च करांसहित) |
|---|---|---|
| १ | रायगड (श्रीवर्धन,अलिबाग, मुरुड) | रु.१२.०० लक्ष |
| २ | फलटण | रु.४.०० लक्ष) |
| ३ | मुरबाड | रु.४.०० लक्ष |
| ४ | भंडारदरा | रु.४.०० लक्ष |
| ५ | जुन्नर | रु.४.०० लक्ष |
| ६ | सिंधुदुर्ग | रु.४.०० लक्ष |
| ७ | औरंगाबाद | रु.४.०० लक्ष |

| | | |
|---|---|---|
| ८ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान | रु.४.०० लक्ष |
| ९ | रत्नागिरी | रु.४.०० लक्ष |
| १० | लोणार | रु.४.०० लक्ष |
| ११ | अहमदनगर शहर | रु.४.०० लक्ष |
| १२ | नाशिक | रु.४.०० लक्ष |
| **एकूण खर्च रु.५६.०० लक्ष (सर्व करांसहित)** | | |

२. अटी व शर्ती :-

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध आदेश / नियमान्वये नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील व जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर निधी वित्तीय वर्ष २०२१-२२ मध्ये खर्च करण्यात यावा व प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

४) ज्या करीता निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) याकरीता आवश्यक परवानग्या व तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

६) वितरीत केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करणे तसेच कामांच्या पुर्णत्वाचे प्रमाणपत्र देणे इत्यादी जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष "मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१, सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करावी व कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून सदर शासन निर्णयामधील प्रत्येक अटींची व परिशिष्टामधील तपासणी सूची बाबींची पूर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२११०२६१८०५००१९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2021.11.01 15:16:40 +05'30'

**(र. ज. कदम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (का.व्यय-१५/अर्थोपाय / अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.(यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिका-यांकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
१२. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***